**एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-३ (सीपीटीपी-३) अंतर्गत प्रशिक्षण घेतलेल्या तहसिलदार,गट-अ यांचा परिविक्षा कालावधी समाप्त करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांक -टिआरएन-२०१९/प्र.क्र.१६/सीपीटीपी-अ**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग
मंत्रालय, मुंबई
दिनांक-१९/०५/२०२२

<u>वाचा</u> :- १.सा.प्र.वि.,शासन निर्णय क्र.टिआरएन-२०१३/प्र.क्र.८४/१३/१८-ब, दि.२०/०१/२०१४
२.सा.प्र.वि.,शासन निर्णय क्र.टिआरएन-०४१६/ प्र.क्र.६१/१६/१८-ब , दि.०४/०८/२०१६
३.सा.प्र.वि.,शासन निर्णय, क्र. परिवी-२७१५ /प्र.क्र.३०२/ आठ, दि.२९/०२/२०१६
४.सा.प्र.वि.,कार्यालयीन आदेश क्र. टिआरएन-२०१७ /प्र.क्र.३१/ सीपीटीपी-अ, दि.४/१२/२०१७

## शासन आदेश

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने राज्यसेवा (मुख्य) परीक्षा -२०१५ अंतर्गत तहसिलदार (गट- अ) या पदावर शिफारस केलेल्या उमेदवारांना दिनांक ०४/०८/२०१६ च्या कार्यालयीन आदेशान्वये परिविक्षाधीन अधिकारी म्हणून नियुक्ती देण्यात आली होती. सदर परिविक्षाधीन अधिकाऱ्यांसाठी दिनांक ०२/०५/२०१६ ते दिनांक ३०/०४/२०१८ या कालावधीत एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-३ (सीपीटीपी-३) आयोजित करण्यात आला होता. यामधील पुढील तक्त्यातील संबंधित ०४ अधिकाऱ्यांनी परिविक्षाधीन कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केला आहे.

२. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दिनांक २९ फेब्रुवारी,२०१६ मधील क्रमांक १ (३) (ब) नुसार परिविक्षा कालावधीत नैमित्तीक रजेव्यतिरिक्त कोणत्याही स्वरूपाची रजा उपभोगल्यास उमेदवारांचा परिविक्षा कालावधी रजेच्या कालावधीएवढा वाढविण्यात येतो. त्यानुसार खालील तक्त्यातील अधिकाऱ्यांचा स्तंभ क्र. ५ मध्ये नमूद रजा कालावधीएवढा परिविक्षा कालावधी वाढविण्यात येत असून, तो स्तंभ क्र. ७ मध्ये नमूद केलेल्या दिनांकास समाप्त करण्यात येत आहे.

**(प्रशिक्षण कालावधी दिनांक ०२/०५/२०१६ ते दिनांक ३०/०४/२०१८)**

| अ. क्र. | नाव व पदनाम | शिफारस प्रवर्ग | परिविक्षाधीन म्हणून सेवेत नियुक्तीचा दिनांक | परिविक्षा कालावधीत उमेदवाराने उपभोगलेल्या रजा (दिवस) | विभागीय परीक्षा उत्तीर्ण/संधी/ परीक्षेचा कालावधी | परिविक्षा कालावधी समाप्तीचा दिनांक |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| **१** | श्री. राजपुत विक्रम महाजन | DT-A | ०२/०५/२०१६ (म.पू.) | निरंक | विभागीय परीक्षा सन-२०१४/१ ली संधी (निकालाचा दिनांक २७/०३/२०१७) | ३०/०४/२०१८ (म.नं.) |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| २ | श्री. रसाळ शितल रमाकांत | SBC | ०२/०५/२०१६ (म.पू.) | ३७ दिवस | विभागीय परीक्षा सन-२०१४/१ ली संधी (निकालाचा दिनांक २७/०३/२०१७) | ०६/०६/२०१८ (म.नं.) |
| ३ | श्रीमती शितल पद्मसिंह राजपूत | DT-A FEMALE | ०२/०५/२०१६ (म.पू.) | निरंक | विभागीय परीक्षा सन-२०१४/१ ली संधी (निकालाचा दिनांक २७/०३/२०१७) | ३०/०४/२०१८ (म.नं.) |
| ४ | श्री. रावडे स्वप्निल अप्पासाहेब | OPEN | ०२/०५/२०१६ (म.पू.) | १२ दिवस | विभागीय परीक्षा सन-२०१४/१ ली संधी (निकालाचा दिनांक २७/०३/२०१७) | १२/०५/२०२८ (म.नं.) |

३. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि. २९/०२/२०१६ मधील अ.क्र.८ मध्ये "परिविक्षा अधिकारी यांस पहिली वेतनवाढ त्यांचा एक वर्षाचा परिविक्षेचा कालावधी पूर्ण झाल्यावर देण्यात यावी, त्यानंतरची वेतनवाढ त्यांनी परिविक्षा कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केल्यावर देण्यात यावी" अशी तरतूद आहे. त्यानुसार उपरोक्त ०४ अधिकाऱ्यांना पहिली वेतनवाढ दिनांक ०४/१२/२०१७ च्या कार्यालयीन आदेशान्वये मंजूर करण्यात आलेली आहे. आता संबंधित अधिकाऱ्यांनी परिविक्षा कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केला असल्याने त्यानंतरची वेतनवाढ त्यांना अनुज्ञेय करण्यात यावी.

४. उपरोक्त **"परिच्छेद २"** मधील तक्त्यातील संबंधित परिविक्षाधीन तहसिलदार, गट-अ यांनी प्रशिक्षण कालावधीत घेतलेल्या रजांचा तपशील व रजा मंजूरी आदेश क्षेत्रिय कार्यालयाकडून व यशदा, पुणे या प्रशिक्षण संस्थेकडून प्राप्त झाले असून त्याआधारे सदर आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक **२०२२०५१९१२०१५०६७०७** असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anuradha Kakasaheb Khanvilkar

Digitally signed by Anuradha Kakasaheb Khanvilkar
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e2fed57d20a51362449278a4aa952427fd085043a65380ece8ec8bac6c4d7d01, serialNumber=3ecf6c53ebd134b34c3b971e3e05a22ee965bf6c82771b162ccce09b22f3cb68, cn=Anuradha Kakasaheb Khanvilkar
Date: 2022.05.19 14:50:20 +05'30'

**(अ. का. खानविलकर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रती**

सबंधित अधिकारी (ईमेलद्वारे)

**प्रत,**

१. सह सचिव/ उप सचिव, (आस्था-तहसिलदार, गट-अ), महसूल विभाग, मंत्रालय, मुंबई
२. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे
३. महालेखापाल, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२,मुंबई/नागपूर
४. निवडनस्ती